**जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक व त्याअंतर्गत येणारे तालुका न्यायालय येथे नव्याने स्थापन झालेल्या न्यायालयांना नवीन संगणक सामग्री खरेदी करण्याकरिता रु.१,०२,५७,८००/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संप्रिसा- २०२२/प्र.क्र.६५/का.७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ जुलै, २०२३.

<u>संदर्भ</u>:- १) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. Spl/Comp/०४०/२०२३, दिनांक ०२.०२.२०२३.
२) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक ०५.०४.२०२३.
३) विभागाच्या दिनांक २४.०४.२०२३ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) समक्रमांकाचा शासन निर्णय दिनांक ०९.०५.२०२३.
५) जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक यांचे पत्र क्र. वित्त/५४८५/२०२३, दिनांक १५.०६.२०२३.
६) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग- III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
७) विभागाच्या दिनांक ३०.०६.२०२३ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**<u>प्रस्तावना</u> :-**

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांनी येवला, इगतपुरी व सिन्नर येथे दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर स्थापन झाले असल्याने, या न्यायालयांसाठी संगणक सामग्री खरेदी करण्याकरिता संदर्भ क्र. १ अन्वये प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे अभिप्राय घेण्यात आले असून, विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २४.०४.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ४ अन्वये सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. संदर्भ क्र. ५ च्या पत्रान्वये GeM पोर्टलवर करण्यात आलेल्या खरेदी प्रक्रियेत L१ रु.३४,५९,६३६/- इतक्या रकमेच्या किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्याची या विभागास विनंती केली आहे. संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयातील परिच्छेद ३.१.२.१ नुसार खरेदी

रकमेतील वाढ (+) १०% च्या मर्यादेत असून, रु.१,०२,५७,८००/- या खरेदीच्या रक्कमेच्या प्रस्तावास संदर्भ क्र. ७ येथील बैठकीत मान्यता देण्यात आली. सदर रकमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार दिनांक ०९.०५.२०२३ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन पुढील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक व त्याअंतर्गत येणारे तालुका न्यायालये येथे नव्याने स्थापन झालेल्या न्यायालयांना नवीन संगणक सामग्री खरेदी करण्याकरिता रु.१,०२,५७,८००/- (अक्षरी रु. एक कोटी दोन लक्ष सत्तावन्न हजार आठशे फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर संगणक सामुग्री खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| मूळ प्रशासकीय मान्यतेनुसार मंजूर रक्कम | L1 Bidding नुसार खरेदीची एकूण रक्कम | वास्तविक किंमत व अंदाजित किंमत यामध्ये (+) 10% | मूळ प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त रक्कम |
|---|---|---|---|
| **रु.98,12,500/-** | रु.1,02,57,800/- | रु.9,81,250/- | रु.4,45,300/- |

३. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार GeM पोर्टलवरुन विहित पध्दतीने करण्यात यावी.

४. सदर संगणक सामग्रीची खरेदी ही माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने दिलेल्या अभिप्रायाच्या अनुषंगाने संदर्भ क्र. २ येथील पत्रात नमूद करण्यात आलेल्या Specifications व अटींच्या अधीन राहून करण्यात यावी.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. यानुषंगाने निधी वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१८१२४९२३७६१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2023.07.18 12:50:10 +05'30'

**( नंदकिशोर ल. मोरे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
२. मा. प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ, चर्चगेट, मुंबई-२०.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१२. कार्यासन अधिकारी, कार्यासन-१३, २३ व २४ विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती/का. ७